**सिनियर ॲडव्होकेट श्री.राजीव पाटील यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.**

**साकीनाका पो. ठा. गु.र.क्र.४८७/२०१६ या गुन्हयातून उद्भवलेल्या मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल (क्रिमि.बेल ॲप्ली.नं.३३५२/२०२३) याचिकेच्या न्यायालयीन कामकाजासाठी.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी-०१२४/प्र.क्र.१७/पोल-१०**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक: १२ जून,२०२५.

**संदर्भ :-** (१) शासन पत्र, विधि व न्याय विभाग, क्र.०७/१८०/एसपीपी/२०२४/'अ' शाखा, दि. १६.०१.२०२४.

(२) शासन निर्णय,वित्त विभाग,क्र.विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम,दि.२९.०७.२०१५.

(३) शासन निर्णय, वित्त विभाग,क्र.विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम,दि.१६.०६.२०१७.

**शासन निर्णय:-**

साकीनाका पोलीस ठाणे गु.र.क्र.४८७/२०१६ या गुन्हयातून उद्भवलेल्या मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल क्रिमिनल बेल ॲप्लीकेशन नं.३५५२/२०२३ या याचिकेच्या अनुषंगाने विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून काम पाहण्यासाठी सिनियर ॲडव्होकेट श्री.राजीव पाटील यांना खालीलप्रमाणे व्यावसायिक फी अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**मा. उच्च न्यायालय, मुंबई येथील कामकाजाकरीता**

अ) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी - १,३५,०००/- (अक्षरी रुपये एक लाख पसतीस हजार फक्त)

ब) प्रति विचारविनिमय फी - ३५,०००/- (अक्षरी रुपये पसतीस हजार फक्त)

सदर फी व्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ सिनियर ॲडव्होकेट श्री.राजीव पाटील यांना अनुज्ञेय होणार नाहीत. तसेच त्यांना कोणत्याही अपरिणामकारक सुनावणीकरीता फीचे प्रदान करण्यात येणार नाही.

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधित प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून तसेच संबंधित मा.न्यायालयाच्या प्रबंधकाकडून तपासून, प्रमाणित करून घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलीस उपायुक्त यांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या "मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) १०८, राज्य मुख्यालय पोलीस (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना - (२०५५ ००९७) - २८-व्यावसायिक सेवा" या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतुदीच्या उपलब्धतेच्या अधीन आणि मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

४. प्रस्तुत शासन निर्णय संदर्भ क्र. २ व ३ वरील वित्त विभाग शासन निर्णयानुसार मा. उच्च न्यायालय व मा. सर्वोच्च न्यायालयात न्यायालयीन प्रकरणी नेमण्यात आलेल्या विशेष सरकारी अभियोक्त्यांना फी अदा करण्यासंदर्भात प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६१२१७५१२३८८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MURLIDHAR MADANRAO MUNDE

Digitally signed by MURLIDHAR MADANRAO MUNDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=6ce40b982ce0fd403128e2717e7e0c7b7377fd69d7d23790cb110e33b1e0491e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=716527D5A822F9E40134FCE6C6C6B8E1521D5C66E1D2D46A3F04B04DE16DF388, cn=MURLIDHAR MADANRAO MUNDE
Date: 2025.06.12 17:52:13 +05'30'

**(मुरलीधर मुंडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. पोलीस सह आयुक्त, (का.व सु.), मुंबई.
३. वरिष्ठ पोलीस निरीक्षक, अंधेरी पोलीस ठाणे, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र १ , मुंबई .
५. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७. सिनियर ॲड.श्री.राजीव पाटील, कृष्ण कुंज, ३६, शिवाजी पार्क, डॉ.एम.बी.राऊत मार्ग, मुंबई.
८. सह सचिव, विधि व न्याय विभाग (अ शाखा), मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती (पोल-१०).